**अल्पसंख्याक बहूल जिल्हयात बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक बियुडी-२०१०/प्र.क्र.४६/का.७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- ३ सप्टेंबर, २०१०.**

संदर्भ :- शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्रमांक - बियुडी -२००९/ प्र.क्र. २६७/का-७, दि. ३० मार्च, २०१०.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने लोकसंख्या, सामाजिक व आर्थिक स्थिती आणि मुलभूत सुविधांची उपलब्धता या मानकांच्या आधारे महाराष्ट्रातील परभणी, बुलढाणा, वाशिम व हिंगोली हे ४ जिल्हे अल्पसंख्याक बहूल जिल्हे म्हणून घोषित केले असून या जिल्हयांच्या सर्वांगीण विकासासाठी बहूक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत अंगणवाडी योजनेसाठी केंद्रातर्फे १००% अर्थसहाय्य देण्यात येणार आहे तर घरकुल योजनेसाठी केंद्राकडून ७५% अर्थसहाय्य देण्यात येणार आहे व उर्वरित २५% अर्थसहाय्यची तरतूद राज्य सरकारने करणे अपेक्षित आहे. इंदिरा आवास योजनेंतर्गत केंद्र शासनाकडुन एका घरकुलाची किंमत रु. ३५०००/- इतकी निश्चित करण्यात आली आहे, पंरतू राज्याच्या ग्राम विकास विभाग व जलसंधारण विभागाने दि.१ एप्रिल २००९ पासून बांधण्यात येणाऱ्या नवीन घरकुलांसाठी रु. ७००००/- प्रती घरकुल इतकी किंमत निश्चित केली आहे, त्यामुळे सदर योजनेंतर्गत सध्या राज्य शासनातर्फे प्रती घरकूल रु. ४२२५०/- इतके अनुदान उपलब्ध करुन दिले जात आहे.

२. उपरोक्त ४ जिल्हयांपैकी बुलढाणा व परभणी या जिल्हयांना घरकुल व अंगणवाडी योजनेसाठी तर वाशिम जिल्हयाला घरकुल योजनेसाठी संदर्भांकित शासन निर्णयान्वये केंद्र व राज्याच्या हिश्श्याच्या ५०% निधी वितरित करण्यात आला होता परंतू काही तांत्रिक अडचणींमुळे वाशिम जिल्हयाने **केंद्राच्या हिश्श्याची** रु. २६२५००००/- (रु. दोन कोटी बासष्ठ लक्ष पन्नास हजार फक्त) एवढी रक्कम सन २००९-१० मध्ये आहरित न केल्याने सदर रक्कम सन २०१०-११ मध्ये त्याच प्रयोजनाकरिता आहरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. तसेच राज्य शासनाने वाशिम व परभणी जिल्हयांसाठी केंद्र शासनास पाठविलेल्या योजंनाच्या अतिरिक्त प्रस्तावानुसार आणि हिंगोली जिल्हयाच्या सुधारित प्रस्तावानुसार केंद्र शासनाने मंजूर केलेल्या प्रती युनिट खर्चानुसार पहिल्या टप्प्यातील ५०% निधी प्राप्त झाला असून त्याअनुषंगाने राज्य शासनाच्या मंजूर प्रती युनिट खर्चाप्रमाणे सदर योजनेसाठी लागणाऱ्या निधीचे विस्तृत विवरण पुढीलप्रमाणे राहील.

**रु.लाखात**

| **अ. क्र.** | **जिल्हा** | **योजना** | **युनिटची संख्या** | **केद्रातर्फे मंजूर करण्यात आलेली ५०% तरतूद** | **राज्याने करावयाची तरतूद** | | | **एकूण रक्कम** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | (रु. ३५००० प्रती घरकूल प्रमाणे २५% च्या ५०% ) | (रु. ७०००० प्रती घरकूल प्रमाणे @ रु. ३३५००/- अतिरिक्त अनुदानाच्या ५०%) | **एकूण राज्याचा हिस्सा** | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | वाशिम | घरकुल योजना (IAY) | १०० | १३.१३ | ४.३८ | १६.७५ | २१.१३ | ३४.२६ |
| | | अंगणवाडी | १३२ | १९८.०० | -- | -- | -- | १९८.०० |
| | | **एकूण** | | **२११.१३** | **४.३८** | **१६.७५** | **२१.१३** | **२३२.२६** |
| २ | हिंगोली | घरकुल योजना (IAY) | २,८७५ | ३७४.९८ | १२४.९९ | ४७८.५५ | ६०३.५४ | ९७८.५२ |
| | | अंगणवाडी | १२ | १८.०० | -- | -- | -- | १८.०० |
| | | **एकूण** | | **३९२.९८** | **१२४.९९** | **४७८.५५** | **६०३.५४** | **९९६.५२** |
| ३ | परभणी | अंगणवाडी | १५ | २२.५० | -- | -- | -- | २२.५० |
| | | **एकूण** | | **२२.५०** | **--** | **--** | **--** | **२२.५०** |
| | | एकूण १+ २+ ३ | | **६२६.६१** | **--** | **--** | **६२४.६७** | **१२५१.२८** |

४. i) उपरोक्त तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल व अंगणवाडी योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून वाशिम जिल्हयासाठी रु. २१११३०००/- (रु. दोन कोटी अकरा लक्ष तेरा हजार फक्त) एवढी रक्कम व परिछेद २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे रु. २६२५००००/- (रु. दोन कोटी बासष्ठ लक्ष पन्नास हजार फक्त) एवढी रक्कम अशी एकूण रु. ४७३६३०००/- (रु. चार कोटी त्रेहात्तर लक्ष त्रेसष्ठ हजार फक्त) एवढी रक्कम तसेच तक्त्यामधील स्तंभ क्र.८ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल योजनेकरिता **राज्याचा हिस्सा** म्हणून वाशिम जिल्हयासाठी रु. २११३०००/- (रु. एकविस लक्ष तेरा हजार फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम वाशिम जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

ii) उपरोक्त तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी घरकुल व अंगणवाडी योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून हिंगोली जिल्हयासाठी रु. ३९२९८०००/- (रु. तिन कोटी बेयान्नव लक्ष अठठयान्नव हजार फक्त) एवढी रक्कम व तक्त्यामधील स्तंभ क्र.८ प्रमाणे घरकुल योजनेकरिता **राज्याचा हिस्सा** म्हणून हिंगोली जिल्हयासाठी रु. ६०३५४०००/- (रु. सहा कोटी तिन लक्ष चौपन्न हजार फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम हिंगोली जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

iii) उपरोक्त तक्त्यामधील स्तंभ क्र.५ प्रमाणे बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१०-११ या वर्षासाठी अंगणवाडी योजनेकरिता **केंद्राचा हिस्सा** म्हणून परभणी जिल्हयासाठी रु. २२५००००/- (रु. बाविस लक्ष पन्नास हजार फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम परभणी जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

वरीलप्रमाणे वाशिम, हिंगोली व परभणी जिल्हयांकरिता केंद्र शासनाच्या हिश्श्याकरिता एकूण रु.८८९.११ लाख व राज्य शासनाच्या हिश्श्याकरिता एकूण रु.६२४.६७ लाख इतका निधी वितरित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

५.	जिल्हाधिकारी, वाशिम/हिंगोली/परभणी यांना सन २०१०-११ करिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

६.	संबंधित जिल्हाधिकारी यांनी **केंद्राचा हिश्श्यामधील** व **राज्याचा हिश्श्यामधील** इंदिरा आवास योजनेंतर्गत घरकुल योजनेची रक्कम संबंधित जिल्हा परिषदेचे प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा (DRDA) यांचेकडे सुपूर्द करावी तर अंगणवाडी योजनेची रक्कम संबंधित कार्यकारी अभियंता,जिल्हा परिषद, बांधकाम विभाग यांचेकडे सुपूर्द करावी.

७.	उपरोक्त निधीचा विनियोग करताना संबंधित योजनेबाबत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने दि.२८/१/२०१० रोजी आयोजीत केलेल्या बैठकीच्या इतीवृत्तांतात वाशिम,परभणी व हिंगोली जिल्हयाकरिता नमूद केलेल्या तसेच सदर योजनेच्या अनुदान वितरणाबाबत केंद्र शासनाचे दि.११/२/२०१० च्या पत्रान्वये विहित केलेल्या अटी व शर्तींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची राहील.

८.	सदर योजनेंतर्गत केंद्राचा हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१ , मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना ०० (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना केंद्राचा हिस्सा (२२३५- ए ५४३) ३१ सहायक अनुदान" या खाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९.	सदर योजनेंतर्गत राज्याचा हिस्स्यावर होणारा खर्च मागणी क्र.झेड ई-१ , मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (२२३५-ए-२३-१) ३१ सहायक अनुदान या खाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

१०.	हा शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्र. ४०७/१४७५, दि. ९/८/२०१० व ५०२/व्यय-४, दि. २४/८/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

११.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००९०६१३५४२२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(व्यंकटेश भट )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हाधिकारी, जि. हिंगोली/जि. वाशिम/जि. परभणी
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, जि. हिंगोली/जि. वाशिम/जि. परभणी
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद, जि. हिंगोली/जि. वाशिम/जि. परभणी
जिल्हा कोषागार अधिकारी, जि. हिंगोली/जि. वाशिम/जि. परभणी
निवडनस्ती.